**राज्य योजना सन २०१७-१८**

वन्यप्राणि अपंगालयाची स्थापना या योजनेकरीता (२४०६-२२३२) निधी वितरीत करणे.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूएलपी-०५.१७/प्र.क्र.१५१ /फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- ३१ मे, २०१७

वाचा :-

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.०४.२०१७.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-वजी/२२(६)/यो/प्र.क्र. २४/ ५२९/१७-१८, दिनांक १८.०५.२०१७.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.३२/(१७-१८)/३४६, दिनांक :- २४.०५.२०१७.

प्रस्तावना :-

सन २०१७-१८ राज्यस्तरीय योजनेतंर्गत वन्यप्राणि अपंगालयाची स्थापना (२४०६-२२३२) या लेखाशिर्षांतर्गत रुपये २००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वन्यप्राणि अपंगालयाची स्थापना (२४०६-२२३२) या योजनेतर्गत रु. १३.९२ लक्षचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे. उक्त योजनेमधील विहीत प्रयोजनाखाली अर्थसंकल्पित निधीच्या ८० % मर्यादेत निधी माहे डिसेंबर, २०१७ पर्यत खर्च करण्यास " **अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांचा खर्च - योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्यास वित्त विभागाबरोबर नियोजन विभागाचीही सहमती आवश्यक नाही** " या अटीवर खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

शासन निर्णय :-

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केलेले प्रस्ताव व वन्यप्राणि अपंगालयाची स्थापना (२४०६-२२३२) या योजनांतर्गत उपलब्ध निधीच्या अनुषंगाने सदर शासन निर्णयान्वये सोबत जोडलेल्या विवरणपत्राप्रमाणे खालील अटींच्या अधीन राहून **रुपये १३.९२.०० लक्ष** निधी खर्च करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१७-१८ मध्ये लेखा शिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीव, पंचवार्षिक योजनाअंतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (००) (१०) वन्यप्राणि अपंगालयाची स्थापना (२४०६-२२३२) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

२. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर कामे करताना भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण ) अधिनियम १९७२ व वन ( संवर्धन ) अधिनियम १९८० तसेच राष्ट्रीय प्राणी संग्रहायलयाच्या मार्गदर्शक तत्वांचा भंग होणार नाही व आवश्यक ती परवानगी घेतली गेली आहे ह्याची दक्षता घ्यावी.

४. प्रस्तावात नमूद ज्या कामांना सक्षम प्राधिकाऱ्यांची प्रशासकीय मंजूरी मिळाली आहे त्यावरच वितरीत अनुदान खर्च होईल याची खातरजमा करण्यात यावी.

५. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

६. प्रस्तावित असलेल्या बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

७. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

८. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक :- १७.०४.२०१५ व क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.०४.२०१७ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.०४.२०१७ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५३११७३७३२१३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2017.05.31 17:42:13 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनवसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर.
५. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
६. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी-०५.१७/प्र.क्र.१५१ /फ-१, दिनांक :-३१ मे, २०१७ सोबतचे
मासिक निधी विवरण पत्र.

(रक्कम रु. लाखात)

| **अ.क्र.** | **लेखाशिर्ष २४०६-२२३२** | **अर्थसंल्पित निधी** | **मे, २०१७** | **एकूण** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ०२-मजूरी | १२०.०० | ९.७५ | **९.७५** |
| २ | २१-पुरवठा व सामुग्री | ८०.०० | ४.१७ | **४.१७** |
| | **एकूण** | **२००.००** | **१३.९२** | **१३.९२** |

****